**तलाठी साझा पुनर्रचना समितीच्या अहवालाच्या अनुषंगाने मंत्रिमंडळ उपसमितीने केलेल्या शिफारसीनुसार राज्यात नवीन तलाठी साझांची व महसूली मंडळांची निर्मिती करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
महसूल व वन विभाग
शासन निर्णय क्रमांकः प्राफेब-२०१०(तलाठी)/प्र.क्र.११२(भाग-३)/म-१०
पहिला मजला (मुख्य इमारत), मंत्रालय, मादाम कामा मार्ग,
हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई-४०००३२.
**दिनांक: २५ मे, २०१७**

वाचा :-
१. शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्र. प्राफेब-२०१०/(तलाठी)/प्र.क्र. ११२/म-१०, दिनांक ०३.०२.२०१४ व समक्रमांकित शासन शुध्दीपत्रक दिनांक १८.०२.२०१४.
२. विभागीय आयुक्त, नागपूर यांचे अ.शा.प.क्र.मशा/कार्या.७(२)/सीआर-२/२०१४, दि.२१.०८.२०१४
३. शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्र. प्राफेब-२०१०(तलाठी)/प्र.क्र. ११२(भाग-३)/म-१०, दिनांक १६.०५.२०१६
४. महसूल व वन विभाग पत्र क्र. प्राफेब-२०१०(तलाठी)/प्र.क्र. ११२(भाग-३)/म-१०, दिनांक १५.११.२०१६
५. विभागीय आयुक्त, अमरावती यांचे पत्र क्र. आकाअ/भूसुधार/अ.का. २/ प्र.क्र./६०/२०१६, दिनांक ५.१२.२०१६
६. विभागीय आयुक्त, नागपूर यांचे पत्र क्रमांक मशा/ ७(२)/सीआर ०२(१४)/२०१६, दिनांक ६ डिसेंबर, २०१६

**प्रस्तावना :-**

महाराष्ट्र राज्य तलाठी संघाच्या मागण्यांसंदर्भात अभ्यास करुन शासनास व्यवहार्य व अभ्यासपूर्ण शिफारसी करण्यासाठी संदर्भीय क्रमांक १ वरील शासन निर्णय, दिनांक ०३.०२.२०१४ व शासन शुध्दीपत्रक समक्रमांक दिनांक १८.०२.२०१४ अन्वये विभागीय आयुक्त, नागपूर यांच्या अध्यक्षतेखाली समिती नेमण्यात आली होती.

सदर समितीने सादर केलेल्या अहवालाचे त्यामधील शिफारसींसह सादरीकरण मंत्रिपरिषदेच्या दि.२६/०४/२०१६ रोजी झालेल्या बैठकीत करण्यात आले. त्यावर चर्चा होऊन मंत्रिपरिषदेने तलाठी साझा पुनर्रचना समितीने सादर केलेल्या अहवालातील शिफारशींची अंमलबजावणी करण्याच्या दृष्टीने पुढील निर्णय घेण्यासाठी मा.मंत्री(महसूल) यांच्या अध्यक्षतेखाली मंत्रिमंडळ उपसमिती गठीत करण्यात यावी व मंत्रिमंडळ उपसमितीचा अहवाल मंत्रिमंडळाच्या अंतिम निर्णयार्थ सादर करण्यात यावा असा निर्णय घेतला. त्यानुषंगाने संदर्भीय क्रमांक ३ वरील शासन निर्णय दिनांक १६.५.२०१६ अन्वये मा.मंत्री (महसूल )यांच्या

अध्यक्षतेखाली गठीत करण्यात आलेल्या मंत्रिमंडळ उपसमितीने दिनांक १६.११.२०१६ रोजी बैठकींचे आयोजन करुन आपला अहवाल सादर केला. सदर अहवाल मंत्रिमंडळाच्या अंतिम मान्यतेसाठी दिनांक १६.०५.२०१७ रोजी झालेल्या मंत्रिमंडळ बैठकीत सादर करण्यात आला असता त्यावर मंत्रिमंडळाने घेतलेल्या निर्णयानुसार राज्यातील तलाठी साझांची पुनर्रचना करुन नवीन साझा व महसूली मंडळ निर्माण करण्याबाबतचे आदेश निर्गमित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

१. राज्यातील वाढती लोकसंख्या व वाढते नागरीकरण यानुषंगाने क्षेत्रीय महसूल यंत्रणेच्या कामात झालेली वाढ विचारात घेता राज्यात एकूण ३१६५ नवीन वाढीव तलाठी साझे व ६ तलाठी साझांसाठी १ महसूली मंडळ या तत्वाप्रमाणे सदर वाढीव तलाठी साझांसाठी ५२८ नवीन महसूली मंडळे खालीलप्रमाणे महसूली विभागनिहाय स्थापन करण्यास शासन या व्दारे मान्यता देत आहे:-

| अ.क्र. | महसूली विभागाचे नांव | नव्याने निर्माण होणाऱ्या साझांची संख्या | नव्याने निर्माण होणाऱ्या मंडळांची संख्या |
|---|---|---|---|
| १ | कोकण | ७४४ | १२४ |
| २ | नाशिक | ६८९ | ११५ |
| ३ | पुणे | ४६३ | ७७ |
| ४ | औरंगाबाद | ६८५ | ११४ |
| ५ | नागपूर | ४७८ | ८० |
| ६ | अमरावती | १०६ | १८ |
| | **एकूण** | **३१६५** | **५२८** |

२. वरीलप्रमाणे नवीन तलाठी साझे व महसूली मंडळे स्थापन करण्याबाबत सर्व विभागीय आयुक्त व जिल्हाधिकारी यांनी खालीलप्रमाणे कार्यवाही करावी:-

(i) परिच्छेद १ मधील तक्त्यात दर्शविल्याप्रमाणे सर्व विभागीय आयुक्त यांनी त्यांच्या अधिपत्याखालील महसूली विभागात निर्माण करण्यात येणारी नवीन तलाठी साझा व महसूली मंडळांची जिल्हानिहाय विगतवारी करुन सदर संख्या त्यांच्या नियत्रंणाखालील सर्व संबंधित जिल्हाधिकारी यांना कळवावी.

(ii) संबंधित जिल्हाधिकारी यांनी जिल्हास्तरावर विभागीय आयुक्त यांनी कळविलेली तलाठी सांझांची वाढीव संख्या विचारात घेवून कोणकोणत्या उपविभागांत/तालुक्यात साझांची वाढ होईल याची एकाचवेळी निश्चिती करुन संबंधित उपविभागीय अधिकारी व तहसिलदार यांना

कळवावे व त्यानुसार नेमके कोणकोणत्या साझांची फोड/पुनर्रचना करावी लागेल हे ठरविण्यासाठी संबंधित उपविभागीय अधिकारी यांच्या अध्यक्षतेखाली त्यांचे अधिनस्त असलेले तहसिलदार यांचा समावेश असलेली समिती गठीत करावी. सदरहू समितीने तालुक्यातील वाढीव साझांची संख्या विचारात घेऊन कोणकोणत्या साझांची फोड/पुनर्रचना करणे आवश्यक आहे त्याचा विचार करावा व त्यानुसार संबंधित सांझाची फोड/पुनर्रचना करणे, नवीन साझांबाबतचे नकाशे व सीमा निश्चित करणे व नवीन साझांचे मुख्यालय कोणत्या ठिकाणी असावे या सर्व बाबींचा सविस्तर अहवाल संबंधित जिल्हाधिकारी यांना सादर करावा.

(iii) जिल्हाधिकारी यांनी वरीलप्रमाणे संबंधित उपविभागीय अधिका-यांकडून प्राप्त अहवालाची तपासणी करुन त्यास मान्यता द्यावी व तद्नंतर महाराष्ट्र जमीन महसूल संहिता, १९६६ च्या कलम ४ अन्वये नवीन नियोजित साझांविषयी प्रारुप अधिसूचना प्रसिध्द करुन प्रस्तावित नवीन साझा निर्मिती विषयी हरकती व सूचना मागविण्याची व्यवस्था करावी.

(iv) तदनंतर जिल्हाधिकारी यांनी यानुषंगाने प्राप्त हरकती व सूचना विचारात घेऊन नवीन साझा निर्मितीबाबत अंतिम अधिसूचना प्रसिध्द करावी.

(v) वरीलप्रमाणे नवीन साझा निर्मिती झाल्यानंतर जिल्हाधिकारी यांनी त्याचपध्द्तीने एकाच वेळी नवीन नियोजित महसूली मंडळांची प्रारुप अधिसूचना सदर मंडळांच्या मुख्यालयांच्या नावासह प्रसिध्द करावी व त्यासंदर्भात प्राप्त होणाऱ्या हरकती व सूचना विचारात घेवून नवीन महसूली मंडळांविषयी अंतिम अधिसूचना प्रसिध्द करावी .

(vi) वरीलप्रमाणे नवीन साझा व मंडळांची निर्मिती केल्यानंतर त्यासाठी लागणाऱ्या नवीन तलाठी व मंडळ अधिकारी संवर्गातील पदांचा एकत्रित पदनिर्मितीचा प्रस्ताव संबंधित जिल्हाधिकाऱ्यांनी आर्थिक भारासह शासनास सादर करावा.

(vii) त्याआधारे एकूण ३१६५ तलाठी व ५२८ मंडळ अधिकारी अशी एकूण ३६९३ नवीन पदे मंजूरीचा प्रस्ताव मा.मुख्य सचिव यांचे अध्यक्षतेखालील उच्चस्तर सचिव समितीसमोर एकाच वेळी मंजूर करण्यास्तव सादर करण्यात यावा. उच्चस्तर सचिव समितीच्या मान्यतेनंतर सदर पदे पुढील प्रमाणे टप्प्या- टप्प्याने सरळसेवा / पदोन्नतीने भरण्याची कार्यवाही करण्यात यावी.

३. वरीलप्रमाणे महसूली विभागनिहाय निर्माण करण्यात येणारी एकूण ३१६५ नवीन तलाठी साझे व ५२८ नवीन महसूली मंडळे कार्यान्वित करण्यासाठी अनुक्रमे तलाठयांची एकूण ३१६५ पदे व मंडळ अधिकाऱ्यांची एकूण ५२८ पदे अशी एकूण ३६९३ नवीन पदे पुढील ४ वर्षात टप्प्या- टप्प्याने खालीलप्रमाणे भरण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे:-

**टप्पा I:- नागरी क्षेत्र व आदिवासी क्षेत्र** - पहिल्या टप्प्यात महानगरपालिका व त्याचे झालर क्षेत्र तसेच "अ" व "ब"वर्ग नगरपरिषदा व त्याचे झालर क्षेत्र आणि क- वर्ग नगरपरिषदा यांचा विचार करुन या भागातील एकूण ४१५ आणि आदिवासी क्षेत्रातील ३५१ असे एकूण ७६६ नवनिर्मित साझांसाठी प्रत्येकी १ याप्रमाणे ७६६ तलाठी पदे व ६ तलाठी साझांसाठी १ महसूली मंडळ या तत्वाप्रमाणे १२८ मंडळ अधिकाऱ्यांची पदे सन २०१७-१८ या वर्षामध्ये प्रचलित कार्यपध्दती व नियमानुसार अनुक्रमे सरळसेवेने व पदोन्नतीने भरण्यात यावी.

**टप्पा II :- ग्रामीण क्षेत्र**- दुसऱ्या टप्प्यात ग्रामीण क्षेत्रातील प्रस्तावित तलाठी साझांसाठी पुढील ३ वर्षात खालीलप्रमाणे पदे भरण्यात यावीत :-

i) वर्ष २०१८-१९ मध्ये "अ"व "ब " वर्ग गावांसाठी नवनिर्मित ८०० साझांसाठी प्रत्येकी १ या प्रमाणे ८०० तलाठी पदे, व ६ तलाठी साझांसाठी १ महसूली मंडळ याप्रमाणे १३३ मंडळ अधिकाऱ्यांची पदे अनुक्रमे सरळसेवा व पदोन्नतीने भरण्यात यावी.

ii) वर्ष २०१९-२० मध्ये ग्रामीण क्षेत्रात आणखी नवनिर्मित ८०० साझांसाठी ८०० तलाठी पदे व ६ तलाठी साझांसाठी १ महसूली मंडळ याप्रमाणे १३३ मंडळ अधिकाऱ्यांची पदे अनुक्रमे सरळसेवा व पदोन्नतीने भरण्यात यावी.

iii) वर्ष २०२०-२१ मध्ये ग्रामीण क्षेत्रातील उर्वरित नवनिर्मित ७९३ साझा व तटीय क्षेत्रातील ६ साझा अशा एकूण ७९९ नवनिर्मित साझांसाठी प्रत्येकी १ याप्रमाणे ७९९ तलाठी पदे व ६ तलाठी साझांसाठी १ महसूली मंडळ या प्रमाणे १३४ मंडळ अधिकाऱ्यांची पदे अनुक्रमे सरळसेवा व पदोन्नतीने भरण्यात यावी.

४. सदरहू शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौ.संदर्भ क्र. ५०९/आपुक, दिनांक ११.४.२०१७ अन्वये प्राप्त सहमतीने तसेच मंत्रिमंडळाच्या दि.१६ मे,२०१७ रोजी झालेल्या बैठकीत प्राप्त मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५.    सदरचा  शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेताक २०१७०५२५१६३४१७१६१९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Manu Kumar Srivastava

Digitally signed by Manu Kumar Srivastava
DN: c=IN, o=All India Services, ou=Principal Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Manu Kumar Srivastava
Date: 2017.05.25 22:08:10 +05'30'

(मनु कुमार श्रीवास्तव)
प्रधान सचिव (महसूल, नोंदणी व मुद्रांक शुल्क )

प्रत :-

१. मा.राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई
२. मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा.मंत्री (महसूल)/ मा.राज्यमंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. सर्व मा.मंत्री/ राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५. मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई.
६. सर्व मंत्रालयीन विभाग यांचे अ.मु.स./प्र.स./सचिव
७. प्रधान सचिव, महाराष्ट्र विधान मंडळ सचिवालय, विधान भवन, मुंबई
८. प्रधान सचिव (महसूल)यांचे स्वीय सहायक, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई
९. सर्व विभागीय आयुक्त
१०. सर्व जिल्हाधिकारी
११. सर्व उपविभागीय अधिकारी
१२. सर्व तहसिलदार
१३. महालेखापाल (लेखापरिक्षा/ लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर
१४.सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
१५.विभागातील सर्व कार्यासने
१६. निवडनस्ती, म-१० कार्यासन